**मनशक्ती, रेस्ट न्यू वे, लोणावळा यांना**
**ताणमुक्त अभ्यासाची माहिती/मार्गदर्शन**
**करण्याची परवानगी देणेबाबत .....**

# महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०११/(१२७/११)/समन्वय
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई
दिनांक : १३ जुलै, २०११

**प्रस्तावना :**

मनशक्ती, रेस्ट न्यू वे, लोणावळा या प्रयोगकेंद्रामार्फत मानवी मनाच्या ताणमुक्त यश व मन:शांती मिळविण्याचे उपाय, यावर वैज्ञानिक संशोधन केले जाते. विविध अभ्यासवर्ग, मानस चाचण्या, बुद्धीनिष्ठ ग्रंथ व मासिक/पाठ या माध्यमातून हे लोकोपयोगी संशोधन समाजापर्यंत पाहोचविण्याचे कार्य केले जाते.

**शासन निर्णय :**

विद्यार्थ्यांच्या ताणमुक्त अभ्यास व परीक्षेतील ताण कमी करण्यासाठी मेंदूशास्त्र, मानसशास्त्र,इ. विविध शास्त्रांवर आधारित प्रयोग, अभ्यासाच्या सोप्या पद्धती, परीक्षा काळातील धैर्य, स्मरणशक्ती वाढविणे त्याचबरोबर सर्वांगीण विकासासाठी प्रयत्न कसे करावेत, याचे मार्गदर्शन नि:स्वार्थ युवक कार्यकर्ते, डॉक्टर्स, इंजिनिअर्स, शिक्षण तज्ञ, विचारवंत यांच्या सहकार्याने मनशक्ती प्रयोगकेंद्रामार्फत केले जाते. हा उपक्रम चालू शैक्षणिक वर्षापासून (सन २०११-१२) राबविण्यासाठी मनशक्ती, रेस्ट न्यू वे, मुंबई-पुणे रस्ता, लोणावळे-४१० ४०१, यांना खालील अटींच्या अधीन राहून परवानगी देण्यात येत आहे -

अ) या कार्यक्रमासाठी विद्यार्थी/पालक/शिक्षक/ कर्मचारी/अधिकारी व संस्था यांच्याकडून कोणत्याही प्रकारचे शुल्क आकारणी केली जाणार नाही.

ब) कोणावरही मार्गदर्शनाची (मनशक्ती अभ्यासाची ) सक्ती केली जाणार नाही.

क) अभ्यासक्रमावर/कार्यालयीन कामकाजावर कोणताही विपरित परिणाम होणार नाही, याची संबंधित संस्था/कार्यालय प्रमुखांनी दक्षता घ्यावी.

ड) या कार्यक्रमासाठी संबंधितांची / कार्यालय प्रमुखांची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील.

२. सदर शासन निर्णय विद्यापीठे/महाविद्यालये/सर्व संचालनालये/कार्यालये यांनी त्यांच्या अधिनस्त कार्यालयांच्या तसेच अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणण्यात यावा व तसा शासनास अहवाल सादर करावा.

३. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०११०७१३१६५९४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

सही/-
(दि.धों.तिवरेकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
मा.मंत्री (उवतंशि) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, (उवतंशि) यांचे खाजगी सचिव
मा.प्रधान सचिव (उवतंशि) यांचे स्वीय सहाय्यक
विश्वस्त, मनशक्ती, रेस्ट न्यू वे, मुंबई-पुणे रस्ता, लोणावळे-४१० ४०१
कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे
संचालक, उच्चशिक्षण संचालनालय, पुणे
संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई
प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
संचालक, कला संचालनालय, मुंबई
संचालक, ग्रंथालय संचालनालय, मुंबई
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव /कार्यासन अधिकारी
निवडनस्ती